**शासनाची बाजू मांडण्यासाठी नियुक्त केलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांची फी अदा करण्यासाठी रू.३०,००,०००/- इतक्या खर्चास मंजुरी देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन.
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक: एसपीपी-२०११/प्र.क्र.१८८/पोल-१०
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ३ सप्टेंबर, २०११

संदर्भ :- १. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे क्र.पोआ/कक्ष-१४/अर्थसं/२(१०३)(२८), दि.१०.०६.२०११ चे पत्र.

शासन निर्णय :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्याकडून नोंदविण्यात आलेल्या गुन्हयांमधून उद्‌भवलेल्या विविध न्यायालयीन प्रकरणात शासनाच्या वतीने बाजू मांडण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्त्यांच्या नियुक्त्या करण्यात आल्या आहेत. सदर प्रकरणांमध्ये नियुक्त करण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना व्यावसायिक फी अदा करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, चालू वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अपु-या तरतुदीमुळे संबंधीत विशेष सरकारी अभियोक्त्यांची फी अदा करणे शक्य नसल्याने, यासाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करण्यासाठी पुरवणी मागणीचा प्रस्ताव पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी वरील संदर्भाधीन पत्रान्वये सादर केला होता. त्यानुषंगाने जुलै, २०११ च्या अधिवेशनात सादर करण्यात आलेल्या रु.३०.०० लाख या रकमेच्या पुरवणी मागणीच्या प्रस्तावास विधी मंडळाने मान्यता दिली असून याबाबत महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०११ (सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२४) महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दिनांक ५.०८.२०११ मध्ये प्रसिध्द करण्यात आला आहे. त्यानुसार विशेष सरकारी अभियोक्त्यांची फी अदा करण्यासाठी एकूण रु.३०,००,००० (रू.तीस लाख फक्त) इतक्या खर्चास खालील अटींच्या अधीन राहून पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

(१) पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी ज्या बाबीकरिता उपलब्ध झालेला आहे, त्याच बाबीवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

(२) वित्त विभागाने मंजूर केलेल्या मासिक निधी विवरणपत्रानुसार सदरहू खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

(३) विशेष सरकारी अभियोक्त्यांना मंजूर करण्यात आलेली व्यावसायिक फी दहशतवाद विरोधी पथक किंवा पोलीस आयुक्त किंवा पोलीस महासंचालक या कार्यालयाकडून यापूर्वी प्रदान करण्यात आलेली नाही. याबाबतची खात्री केल्यानंतरच देयके विहीत कालावधीत कोषागारात सादर करावीत.

२. या बाबीवरील खर्च मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस .. आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४८२/११/व्यय-७, दिनांक २०.८.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९०३१७१२५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. वि. दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई .
- अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
- निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
- वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
- वित्त विभाग (अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई.
- कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवड नस्ती (पोल-१०)